मच्छिंद्रनाथ बंगाल देशाच्या समुद्रीकिनारपट्टीने भ्रमण करीत दक्षिणेकडे निघाले. जगन्नातपुरीचे दर्शन करून रमेश्वरास गेले. रामाचा सेतू पाहून भक्तिभावाने समुद्रस्नान केले. त्यावेळी चिरंजीव मारुतीने मच्छिंद्रनाथास ओळखले आणि जराजर्जर अशा वृद्ध वानराचे रूप घेऊन त्यांच्या नजरेच्या टप्प्यात मारुती जाऊन बसला, आणि मारुतीने मच्छिंद्रनाथाची कसौटी पाहण्यासाठी एक लीला आरभंली. वातावरणातच बदल होऊ लागला, आकाशात काळेकाभिन्न ढग लागले. बघता बघता पावसाचे घनघोर थैमान सुरु झाले. तो वानर अर्थात मारुती पावसात भिजू लागल्यानंतर दरड उकरून, लपण्यासाठी, पावसापासून संरक्षण व्हावे यासाठी गुहा तयार करू लागला. वानराने काय उद्योग चालवला आहे हे मच्छिंद्रनाथ बारकाईने पाहत होते. वरून धो धो पर्जन्यधारा कोसळत आहेत आणि हा वानर ह्या अवचित क्षणी निवाऱ्याची सोय करू पहातोय! ही कृती पाहून नाथांना विस्मय वाटला, ते न राहवून त्या वानरास म्हणाले, "मुसळधार पावसात संपूर्ण भिजल्यानंतर आता तू संरक्षणास्तव निवारा बांधतो आहेस? ही निव्वळ मूर्खपणाची कृती आहे. आता तुझे घर कधी होणार आणि त्यात तू कधी राहणार? चोरांनी, लुटारूंनी, घर लुटून नेल्यानंतर दिव्यात तेल भरून तू प्रकाशाची तजवीज करणार? बैल गेला नि झोपा केला अशी रित झाली आहे. अग्नीने घर पूर्णपणे वेढल्यानंतर विझविण्यासाठी पाण्याची विहीर खोदण्यास सुरुवात करावी; गळ्याला फास आवळला गेल्यावर अमस्तोत्र पठणाचे स्मरण व्हावे; तहानेने व्याकूळ झाल्यावर विहीर खोदावी; पोटात भुकेची आग पडल्यानंतर कामधेनुचे स्मरण व्हावे; किंवा पावसाळा संपल्यानंतर कोठड्या भूमीत बियाणे पेरावेत; अशा प्रकारचा निर्बुद्ध आणि निरर्थक कारभार का करीत आहेस?"

मच्छिंद्रनाथाची मुक्ताफळे ऐकून वानर म्हणाला, "आपण फारच चतुर आहात साधू महाराज! आपल्यासारखी दूरदृष्टी माझ्याकडे नाही, आपले नाव काय?" "मला जती म्हणतात" मच्छिंद्र उत्तरले. "तुला जती कशामुळे म्हणतात? वानराने विचारले, "माझ्याजवळ असामान्य शक्ती आहे, म्हणून मला जती म्हणतात" मच्छिंद्रनाथांनी उत्तर दिले. त्यावर वानर म्हणाला, आम्हाला फक्त जती हनुमंत माहिती आहे, तुमचे नाव कधी ऐकले नाही. तुम्ही अचानक कुठून उगवलांत?"'

त्यावर मच्छिंद्रनाथ म्हणाले, "अरे मर्कटा! मी योग्शक्ती मंत्रशक्ती प्राप्त केल्याने मला जती (यती) ही उपाधी प्राप्त झाली आहे" त्यावर मच्छिंद्रनाथांस हेतूपुरस्सर खिजाविण्यासाठी म्हणण्यापेक्षाही त्यांची पारख करण्यासाठीच वानरूपी हनुमंत म्हणाले, "वा!! छान आहे हं एकूण! पण मी सुद्धा प्रत्यक्ष मारुतीरायाच्या शेजारी काही दिवस राहिलो असतांना त्यांची सेवा केली होती. तेव्हा त्यांनी मलाही अल्प स्वल्प विद्या शिकवली आहे, ती मी तुला दाखवितो त्याचे तू निवारण करावेस नाही तर 'जती' असे नाव सांगण्याच्या वल्गना सोडून दे." मच्छिंद्र म्हणाले, "ठीक आहे! दाखवच तुझी विद्या मला मी गुरुकृपेने त्याचे निवारण करीन. जसा प्रभू राम पहुडला असताना मारुतीने मोठे मोठे पर्वत उचलून त्यांजवर टाकले, पण रामाने झोपूनच धनुष्यबाण चालवून त्याचे चूर्ण केले. त्याचेच प्रत्येक्षिक आता गुरुकृपेने घडून येईल. अरे मर्कटा! सकल ब्रहमांडाचे ओझे नखाग्रावर पेलण्याचे माझी क्षमता असतांना तू तर मला कस्पटासमान आहेस. चल काय पराक्रम आणि चमत्कार दाखविणार आहेस तो दाखव लवकर. पाखंडीपणा दाखवून नाहक विलंब करू नकोस!"

अशा प्रकारचे आव्हान ऐकून वानात्मज क्रोधीत झाला, त्या कोपायमान अवस्थेत वानराने उड्डाण केले आणि मच्छिंद्रनाथांना काही कळायच्या आत एका मागे एक असे सात पर्वत उचलून फेकले. अचानक सात पर्वत अंगावर आल्याचे मच्छिंद्रांनी पहिले आणि "स्थिर हो, स्थिर हो, तिथेच स्तब्ध हो" असे म्हणत 'वातप्रेरक' मंत्रशक्ती सोडल्याने सर्व पर्वत हवेत स्थिर होऊन तरंगू लागले. मग नाथांनी एकच मंत्र टाकून सर्व स्तब्ध झालेले पर्वत पुन्हा त्याच्या मुळ स्थानी पाठवून दिले.

आपण फेकलेले पर्वत मुकाट्याने परतत आहेत हे पाहून महाबली हनुमंत अतिशय क्रुद्ध झाला आणि त्याने रौद्रावतार धारण केला, एक महापर्वत स्वहस्तांनी उपटून मच्छिंदरावर फेकण्यासाठी आकाशमार्गे उड्डाण करून स्वतः प्रकट झाला. नाथांच्या हे दृष्टीस पडताच समुद्रातलेच पाणी हातात घेऊन त्यावर वाताकर्षण मंत्राचा उच्चार करीत मारुतीच्या दिशेने शिंपडले, मंत्राने भारीत झालेल्या त्या पाण्याचे सिंचन होताच मारुतीची हालचाल बंद झाली. दोन्ही हातांनी डोक्यावर धरलेला पर्वत तसाच राहिला. डोक्यावरील अजस्त्र वजन भिरकाविता येईना आणि त्याचे वजनही सहन होईना; अशी बिकट अवस्था निर्माण झाली. कारण मंत्रशक्तीने देह विफल झाला. हातात शक्ती राहिली नाही, पायातील बळ संपले, अक्षरशः प्राण कासावीस झाले.

पुत्र हनुमंताची ही प्राणांतिक अवस्था पाहून वायू देवाचे ह्रिदय कळवळले. 'हनुमंताला मुक्त करावे' म्हणून साक्षात मरुत (वायू) वंदन करून मच्छिंद्रनाथांची विनवणी करू लागला. त्यांच्या विनंतीचा सन्मान करून मच्छिंद्रांनी 'वातप्रेरक' मंत्राने वायू मुक्त केला आणि हनुमंताच्या मस्तकावरील महापर्वत त्याच्या मुळ ठिकाणी ठेऊन दिला.

जराजर्जर अवस्थेतील कपीरुपामधला मारुती आपल्या मुळ रुपात खाली उतरला. वायुदेव आणि मच्छिंद्रनाथाजवळ आला. पिता वायुदेवांना वंदन करून नंतर नाथांना म्हणाला, "धन्य धन्य! मच्छिंद्रनाथा!! आपली शक्ती बलाढ्य आहे" त्यावर वायुदेव म्हणाले, 'पुत्र मारुती! याच्या बलाढ्य शक्तीसमोर तुझे माझे बळ नगण्य आहे. नाथांची गुरुभक्ती, ईश्वरभक्ती अजोड आहे. या सिद्धयोगीची मंत्रवाणी अमोघ आहे. ते म्हणतात, "माझी भक्ती, गुरूची शक्ती, ईश्वरी वाचा...! यांना पंचमहाभूते आणि देव देवता वश आहेत. हे महा बलाढ्य योगी आहेत".

मरुत आणि मारुती यांच्या चरणांना नम्रतेने स्पर्श करीत मच्छिंद्रनाथ म्हणाला, "आपली उभयतांची कृपा माझ्यावर असावी. मला आपल्याशी सख्य जोडावयाचे आहे. आपणांबरोबर व्यर्थ संघर्ष आणि कलह मला नको आहे."

वायुदेव म्हणाले, "मच्छिंद्रनाथा तुझ्या अंगीभूत कार्यासाठी आम्ही पिता पुत्र सहाय्य करू. ब्रह्मसंकटात श्रीविष्णूने (मात्स्यावतरात) सहाय्य केले आहे. प्रभू रामचंद्रांच्या सहय्यासाठी हनुमंत धावला, त्याचप्रकारे साद घालताच आम्ही तुझ्यासाठी धावत येऊ. हे आमचे वचन आहे." असे म्हणून वायुदेवाने हनुमंताचा हात मच्छिंद्रनाथाच्या हातात देऊन त्यांचा मिलाप केला आणि ते स्वस्थानी निघून गेले.

मच्छिंद्रनाथांची क्षमता तपासण्यासाठी मारुतीची क्लुप्ती सध्य झाली होती. मच्छिंदराचा हात स्वहातात ठेवून हनुमंत म्हणाला, "महाराजा! माझ्या प्रमाणेच तुझ्यामध्येही 'जती' म्हणून मिरविण्याची योग्यता आहे आणि क्षमता ही आहे. तू, भगवंताने तुझ्यावर सोपविलेल्या कार्यात यश मिळणार याबद्दल संदेह नाही.

त्यावर मच्छिंद्रनाथ मारुतीरायास विचारू लागले, "महाबली! माझी शंका आपण दूर करावी आपण सर्वज्ञ आहात, त्रिकाळ ज्ञानी आहात. आपणासारखा भविष्यवेत्ताही दुसरा कोणी नाहीय. आपण यापूर्वी 'नाग अस्वत्थ' वृक्षावर मला भेटलात तेव्हा प्रसन्न मनाने शाबरी विद्येस सहाय्य करण्याचा आशीर्वाद मला दिला आहे. असे असतांनाही आज आपण माझ्याबरोबर व्यर्थ संघर्ष का निर्माण केला ह्याची उकल मला होत नाही."

स्मितवदन होत हनुमंत म्हणाले, "तू सेतू बंधनाजवळ समुद्रात स्नान करीत होतास, तेव्हाच मी तुला ओळखून मुद्दाम जवळ आलो. तू कवी नारायणाचा अवतार असून मात्स्यीच्या उदरान तू जन्म घेतल्याची पूर्वपिठीका मला माहित आहे. नाग अस्वत्थ वृक्षावरील आशीर्वाद प्राप्तीनंतर तू खरोखर किती नैपुण्य प्राप्त केले आहेस, याची पारख करण्यासाठी हे नाट्य घडवून आणले होते. कारण भविष्य काळात अनेक अलौकिक कार्ये पार पडतांना तुझा टिकाव लागेल की नाही याची खात्री मला करावयाची होती. त्यात तू निश्चितच उत्तीर्ण झाला आहेस.

आता इथून पुढे स्त्री राज्याची हद्द सुरु होते. तेथे पुरुषांना मज्जाव आहे आणि गेलेच तर मृत्यु अटळ आहे. म्हणून पुरुष तिथे जात नाहीत. तेव्हा तू माझ्या संरक्षणछत्राखाली माझ्याबरोबर चलावे. तुझ्या कडे माझे एक काम आहे. माझ्या मस्तकावरील ओझे उतरविणे केवळ तुझ्या हातात आहे..."

कसले ऋण महबली? महाराज! आपण सविस्तरपणे मला सांगा." मच्छिंद्रनाथ विचारू लागले.

मारुतीराया आपली समस्या कथन करू लागले. "योगीराज मच्छिंद्रा! मी प्रभू रामचंद्राचा दास आहे, हे तू जाणतोस ना. तर रावण वधानंतर राक्षांचा नाश करून सीता, राम यांच्यासह आम्ही अयोध्यानगरीत आलो. एके दिवशी सितामाई मनाशी विचार करत होती. की मी हनुमंत रामाचा एकनिष्ठ भक्त आहे. त्याचे कल्याण व्हावे यासाठी आपणच आग्रही असले पाहिजे. त्याला पत्नी, पुत्र, घर, संसार अशी गृहस्थाश्रमाची सर्व सुखे उपलब्ध झाली पाहिजेत. पण तो ब्रह्मचारी असल्याने सहजासहजी मान्य करणार नाही पण त्याला जर शपथ घालून वचनबद्ध केले, तर त्याला संसारी बनवता येईल." असा विचार करून सीतामाईने मला बोलाविले आणि म्हणाल्या. "मरुतपुत्रा! तू त्रिलोकात धन्य आहेस. माझे एक मागणे आहे. ते तू पूर्ण करण्याचे वचन मला द्यावेस. तू नकार देणार नाहीस याचा मला विश्वास आहे कारण एकवचनी माणसे प्राण देतील पण वचनभंगाचे पातक करणार नाहीत. शिबी राजाने स्वतःच्या शरीराचे मांस देऊन कबुतराचे प्राणरक्षण करून वचन निभावले. अर्थात तू सुद्धा वचनाचा पक्का आहेस आणि अज्ञाधारकही आहेस. हे मी जाणून आहे." अशी प्रस्तावना ऐकल्यानंतर मी उत्तरलो, "माते आपण आज्ञा करावी. आपल्या आज्ञेचे पालन करीन"

सीतामाई म्हणाल्या, "आधी वचन दे. मग सांगेन." मी म्हणालो, "माते! तू सांगशील ते कार्य करीन, प्राण सुद्धा देईन. हे माझे वचन आहे"

त्यावर सीतामाई म्हणाल्या, "अंजनीपुत्रा! तू गृहस्थाश्रम स्वीकारून सुखाने संसार करावास. विवाह करून प्रापंचिक सुख भोगावेस, पत्नीपुत्रांचे सौख्य तुला मिळावे, अशी माझी मनोकामना आहे. ती तू पर्ण करावी" सितामाईचे बोलणे ऐकून मी चिंतेत पडलो माझे मुख म्लान झाले. मोठेच संकट माझ्यावर पडले. पण वचन देऊन बसलो होतो. होय किंवा नाही उत्तर देण्याऐवजी प्रभू रामचंद्रांकडे धावलो.

श्रीराम काळजीयुक्त स्वरात विचारू लागले, "वायूनंदना! म्लान वदन कशासाठी केले आहेस? काही अनर्थ घडला आहे का? सीतामाई आणि माझ्या मध्ये घडलेला संवाद कथन केल्यावर सीतापती सुहास्यवदनाने मला म्हणाले, "अहो ब्रह्मचारी हनुमंता! चिंता करू नका कारण स्त्री राज्यातील सर्वच स्त्रिया तुझ्याच कांता आहेत. कसे ते समजून घे. सत्ययूग, त्रेतायुग, द्वापारयुग आणि कलीयुग अशी चार युगे आहेत. तू, मी, सीता आणि रावण असे सर्वजण प्रत्येक युगाच्या चौकडीत जन्म घेऊन विधात्याच्या नियोजनाप्रमाणे कार्य करीत आहोत तर मी नव्याण्णवावा राम, तू नव्याण्णवावा मारुती आणि रावणसुद्धा नव्याण्णवावाच होता. ही सगळी चार युगांची (चौकडी) किमयागिरी आहे. चौदा चौकड्यांचा राजा रावण असे म्हणतात ते केवळ यामुळेच. याचा सरळ अर्थ हा आहे की जन्ममृत्युचे आणि चौकडी युगाचे हे चक्र पुन्हा पुन्हा अविरतपणे निर्माण होत असते. त्याप्रमाणे आपल्या अवताराचीही पुनरावृत्ती होत आहे. प्रत्येक वेळी आपण रावण वध करून आल्यानंतर स्त्री राज्यात जाण्याची तुझी भूमिका असते. त्याप्रमाणे या अवतारातील ती वेळ आली असल्याने तुला जाणे भाग आहे"

प्रभू रामचंद्राच्या या स्पष्टीकरणाने मी अधिकच बिथरलो. मी प्रश्न केला, "प्रभू! मी प्रखर ब्रह्मचर्यव्रती असल्यामुळे माझा त्या स्त्रियांना काय उपयोग होणार आहे. त्याची कामपूर्ती कशी होणार? त्यावर प्रभू म्हणाले, "तू उधर्वरेता आहेस. तुझ्या भुभूःकार श्वास संपर्काने स्त्रियांना गर्भधारणा होईल. त्यांचा काम शांत होईल प्रत्येक्ष संभोग करावा लागणार नसल्याने तुझे ब्रह्मचर्य भंग पावणार नाही. तस्मात तू स्त्री राज्यात अवश्य जा."

मारुतीराया मच्छिंद्रास सांगू लागला, "प्रभू रामाच्या आज्ञेप्रमाणे मी स्त्री राज्यात गेलो. अशा प्रकारे स्त्री राज्यात जाऊन प्रापंचिक होऊन सितामातेच्या वचनातून मुक्त झालो आहे. पण स्त्री राज्याच्या राजसिंहासनावर मेनका नावाची राणी राज्य करीत होती. तिला एका अनोख्या वास्तवाची जाणीव झाली होती. ती जाणीव म्हणजे देव, दानव, मानव, पशु, पक्षी इत्यादींमध्ये नर आणि मादी असा लिंग भेद आहे, आणि ते एकमेकांशी इंद्रिय संभोगाद्वारे आपली कामेच्छा तृप्त करतात. त्या प्रकारचे सुख आपल्याला मिळत नसल्याची जाणीव होऊन ती फारच दुःखी झाली, तिने घोर तपानुष्ठान आरंभले माझ्या नावाचा जप करीत स्वतःच्या देहाचे रती रती प्रमाणात मांस तोडून हवन कुंडात अर्पण केले. बारा वर्षे झाली. सर्व मासांश लयाला गेले. मी प्रसन्न होऊन प्रकट होताच माझ्या पायाला मिठी मारून इंद्रिय संभोगाद्वारे कामपुर्तीची मागणी करू लागली. मी हे अशक्य असल्याचे निक्षून सांगितले आणि वचन दिले की, "उपरीचर पुत्र, कवी नारायाणाचा अवतार योगीराज मच्छिंद्र येउन तुला इंद्रियसुख देईल, तेव्हा मच्छिंद्रनाथा आता हे कार्य करून तू मला मेनका राणीस दिलेल्या वचनातून मुक्त कर."

मच्छिंद्र मारुतीरायाच्या विनंतीने थाररलाच. तो म्हणाला, "उधर्वरेता मारुतीराया, मला ही काय भलतीच गळ घालता? मी सुद्धा बालब्रह्मचारी आहे. कामवासनेचा मी तिरस्कार करतो. मी जर वासनेत फसलो तर नाथपंथास कलंक लागेल. जती या नावालाच काळीमा लागेल. असे काही कुकर्म केले तर जगात माझी निंदा होईल. इतर नाथपंथी योगी मला वाळीत टाकतील. माझा विटाळ मानतील. माझी केवढी अपकिर्ती होईल. मुळातच स्त्री संग फार वाईट आहे. विनाशकारी मोहनास्त्र आहे. लोभाने इंद्र कलंकित झाला. चंद्र डागाळला. ब्रह्मदेवाची अब्रह्म म्हणून दुष्किर्ती झाली. भिल्लीणीमुळे शिवाचा बदलौकिक झाला. रंभेपाई विश्वामित्राचा तपोभंग झाला. हे सर्व तू जाणून आहेस , तरीही मला पापकर्म करावयास भाग पडतोस ?"

त्यावर हनुमंत म्हणाला, “योगीनाथ हे विधिलिखित आहे. ते घडणारचं. प्रभू रामचंद्रानेच सांगितल्याप्रमाणे तू सुद्धा नव्याण्णवावा मच्छिंद्र आहेस. तुझ्यापासून त्या मेनका राणीला जो पुत्र होणार आहे, त्याच्या रूपाने प्रत्यक्ष उपरिचर वसू धरतीवर अवतार घेणार असून मीननाथ या नावाने नाथपंथीयांत विख्यात होणार आहे. विधिलीखीत असल्याने यात बदल होणार नाही.

हनुमंताचा युक्तिवाद मच्छिंद्रनाथांना भावला विधिलिखित अट्टल असते. शेवटी मच्छिंद्रांनी हनुमंतास होकार दिला. परंतु त्याचवेळी जाण्याचे टाळले. प्रारंभी तिर्थयात्रा करून मग स्त्री राज्यात जाईन असे आश्वासन दिले. स्त्री राज्यात जाण्यास मच्छिंद्र राजी झाला यामुळे हनुमंत मनोमनी आनंदित झाला आणि त्याचा निरोप घेऊन अदृश्य झाला. त्यानंतर मच्छिंद्र हिंगला देवीच्या दर्शनाची इच्छा धरून तीर्थाटनासाठी रवाना झाला.

फलश्रुती: ह्या अध्यायच्या पठणाने शत्रूचा पाडाव होईल. कोणी मुठ मारली असेल तर, स्वतः मारुतीराया त्या घरात वास्तव्य करून रक्षण करील.